महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिमेअंतर्गत पुरस्कार पात्र गावांसाठी ४३ शिल्ड खरेदी करणे तसेच ७ जुन्या ट्रॉफीची दुरुस्ती करुन घेण्याबाबतच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत......

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. तंमुगा-१००८/सीआर-४० (भाग-२)/पोल-१५

मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक: ३ मार्च, २०१०.

वाचा:- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र.तंमुगा १००८/सीआर-४३/२००८/पोल-१५, दि. १४.८.२००८.

शासन निर्णय :- राज्यामध्ये महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिम दि.१५.८.२००७ पासून सुरु करण्यात आली आहे. या मोहिमे अंतर्गत तंटामुक्त गावांना लोकसंख्येच्या आधारावर पुरस्कार आणि सन्मानचिन्ह देवून गौरविण्यात आलेले आहे. सन २००७-२००८ आणि २००८-२००९ या वर्षात पुरस्कारास पात्र ठरलेल्या गावांपैकी १०० निवडक गावांना राज्यस्तरीय पुरस्कार वितरण समारंभातून दिनांक २०/८/२००९ रोजी पुरस्कार प्रदान करण्यात आलेल आहेत. सन २००८-०९ या वर्षी तंटामुक्त आलेल्या एकूण गावांपैकी शांतता पुरस्कारास पात्र असणाऱ्या एकूण ४३ गावांना वितरीत करण्याकरीता ४३ शिल्ड व सन २००७-२००८ या वर्षामधील जुने ७ ट्रॉफी तंटामुक्त गावांना वितरीत करण्याकरीता दुरुस्त करुन घेण्यात आल्या होत्या. सदरचे कामकाज दि ॲवॉर्ड गॅलरी, गोरेगाव, मुंबई या अभिकरणाकडून खालील दराने करुन घेण्यात आले आहे.

| अ.क्र. | शिल्ड / ट्रॉफी | दर प्रती नग | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| १ | ४३ शिल्ड | रुपये २,७००/- प्रती नग | रुपये १,१६,१००.००/- |
| २ | ७ ट्रॉफींची दुरुस्ती | रुपये २५०/- प्रती नग | रुपये १,७५०.००/- |
| | | एकूण | रुपये १,१७,८५०.००/- |
| ३ | मुल्यवर्धित कर | १२.५० % | रुपये १४,७३१.२५/- |
| | | एकूण | रुपये १,३२,५८१.२५/- |
| | | | (-) ०.२५/- |
| | | एकूण देय रक्कम | रुपये १,३२,५८१.००/- |

दि ॲवार्ड गॅलरी या अभिकरणास ४३ शिल्ड व ७ ट्रॉफीची दुरुस्ती याकरीता वरील दराने एकूण रुपये १,३२,५८१/- (रु. एक लाख बत्तीस हजार पाचशे ऐक्याऐंशी फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

०२. पोलीस महासंचालकांनी संबधीत अभिकरणास एकूण रुपये १,३२,५८१/- (रु. एक लाख बत्तीस हजार पाचशे ऐक्याऐंशी फक्त) इतकी रक्कम अदा करावी.

०३. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र.बी-१, लेखाशीर्ष-२०५५-पोलीस (००) (१०९) जिल्हा पोलीस (००) (१०) तंटामुक्त गाव मोहीम (२०५५-०५३-३) ५० इतर खर्च या खालील सन २००९-१० या वर्षासाठी उपलब्ध निधीतून करण्यात यावा. याबाबतचे देयक पारीत करण्यास पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र- ७२/१०/व्यय ७, दिनांक ११/०२/२०१० अन्वये त्या विभागाच्या दि. २४/२/२०१० रोजीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

२/३/२०१०

(वि. ब. जाधवर)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रती,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
महालेखापाल-१ (ले व अ/लेखापरिक्षा) महाराष्ट्र,मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा परीक्षा, अधिकारी,मुंबई
वित्त विभाग (व्यय-७/ अर्थ-१०) मंत्रालय,मुंबई
निवडनस्ती, पोल-१५